**वस्तू व सेवा कर विभागाकरीता (मुंबई विभाग) १४ निर्लेखित वाहनांऐवजी १४ नवीन वाहने खरेदी करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-१२२३/प्र.क्र.१७/वि.प्र.४**

नवीन प्रशासकीय भवन,३ रा मजला,मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.

दिनांक : १२ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वाहन-१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि. १०. ०९.२००१.

२. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विकवि-१२११/प्र.क्र.३५४/वि.प्र.४, दि. ३०.०३.२०१५.

३. उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४ /प्र.क्र.८२/ भाग-III / उद्योग- ४,दि.०१ डिसेंबर,२०१६.

४. उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण- २०१६ / प्र.क्र.२१५ / उद्योग-४,दि.२४ ऑगस्ट,२०१७.

५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वाहन-२०१४/प्र.क्र.११/ विनियम, दि.०२.०२.२०२४.

६. विशेष राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, वस्तू व सेवा कर भवन,माझगाव यांचा जा. क्र. राउआ (जनसंपर्क)/आस्था १४/ १४ वाहन खरेदी /प्रशा. व वित्ती.मान्यता/ २०२३-२४/ ब-३३७९ मुंबई, दि. २१.०३.२०२४

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भीय क्र.१ येथील शासन निर्णयानुसार शासकीय व इतर कार्यालयांमध्ये वाहनांच्या वापरासंबंधीचे धोरण निश्चित करण्यात आलेले आहे. तद्नुसार संदर्भीय क्र. २ येथील शासन निर्णयान्वये वस्तू व सेवा कर विभागासाठी एकूण २०८ वाहनांचा वाहन आढावा मंजूर करण्यात आला होता. सदर मंजूर वाहन आढाव्यातील मुंबई विभागातील १४ वाहनांचे वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग- पहिला, उप विभाग- दोन मधील अ.क्र. १९-क मधील नियम क्र. ६९ नुसार विहीत अटी व शर्तीची पूर्तता करुन निर्लेखन करण्यात आलेले असून सदर १४ निर्लेखित वाहनांऐवजी १४ नवीन वाहन खरेदी करण्याबाबतचा प्रस्ताव राज्यकर आयुक्त कार्यालयाने संदर्भीय क्र.६ येथील पत्रान्वये शासनास सादर केला आहे. त्यानुसार वस्तू व सेवा कर विभागातील (मुंबई विभाग) १४ निर्लेखित वाहनांऐवजी १४ नवीन वाहने खरेदीचा प्रस्ताव संदर्भीय क्र.५ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती यांच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. तद्नुसार अध्यक्ष,राज्यस्तरीय

वाहन आढावा समिती यांच्या मान्यतेनुसार वस्तू व सेवा कर ( मुंबई विभाग ) विभागासाठी १४ नवीन वाहन खरेदीबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय-</u>**

उपरोक्त संदर्भीय क्र. २ येथील शासन निर्णयान्वये मंजूर वाहन आढाव्यानुसार वस्तू व सेवा कर विभागातील मुंबई विभागासाठी उपलब्ध ४९ शासकीय वाहनांपैकी १४ शासकीय वाहने निर्लेखित केली असून मुंबई विभागासाठी नवीन शासकीय वाहनांची नितांत आवश्यकता लक्षात घेता, वस्तू व सेवा कर विभागातील मुंबई विभागाच्या वापरातील १४ निर्लेखित वाहनांच्या बदली १४ नवीन शासकीय वाहने संदर्भीय क्र. ५ येथील शासन निर्णयानुसार विहीत प्रति वाहन रु. ८.०० लक्ष किंमत मर्यादेत (वाहनाची किंमत+ टेंम्पररी रजिस्ट्रेशन चार्जेस+ सहायभूत साहित्य इत्यादी अंतर्भूत करुन) अधिक त्यावरील अनुज्ञेय वस्तू व सेवा कर यासहित खरेदी करण्यास पुढील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती-</u>**

अ) वस्तू व सेवा कर विभागाने खरेदीसाठी प्रस्तावित केलेल्या १४ निर्लेखित वाहनांमधील १३ वाहनांचा विभागाच्या वाहन आढाव्यात समावेश असून वाहन क्र.एमएच-०१-झेडए-०९९३ या नवीन खरेदीसाठी वस्तू व सेवा कर विभागाने प्रस्तावित केलेल्या निर्लेखित वाहनाचा वाहन आढाव्यावेळी सादर केलेल्या जोडपत्र-अ मध्ये एमएच-०१-एएन-०९९३ असा उल्लेख आहे. याबाबत वाहनाच्या कागदपत्रांची तपासणी करुन योग्य वाहन क्रमांक दर्शविण्याची जबाबदारी पूर्णत: वस्तू व सेवा कर विभागाची राहील.

आ) वाहन आढाव्यावेळी विभागाने सादर केलेले "जोडपत्र -अ " नुसार वस्तू व सेवा कर विभागाकडील वाहनांचे विभागांतर्गत हस्तांतर खूप मोठ्या प्रमाणावर होत आहे. सदर हस्तांतरणामुळे निर्लेखित वाहनांबदली नवीन वाहन खरेदीच्या प्रस्तावांना मान्यता प्राप्त होण्यास विलंब होतो. सबब, अशा प्रकारे हस्तांतरण होणार नाही याची वस्तू व सेवा कर विभागाने दक्षता घ्यावी.

इ) वस्तू व सेवा कर विभागाने वाहनांचे हस्तांतरण मोठ्या प्रमाणावर केले आहे. यास्तव, निर्लेखित वाहन ज्या मूळ पदाधिकाऱ्याकडे होते त्यांना वाहन देणार आहे वा आता सद्यस्थितीत निर्लेखित वाहन ज्या पदाधिकाऱ्यांकडे वा कार्यालयाच्या वापरात होते त्यांना देण्यात येणार आहे याचा बोध होत नाही. यास्तव यापुढील प्रस्ताव चिन्हांकित करुनच सादर करण्याची दक्षता वस्तू व सेवा कर विभागाने घ्यावी.

ई) वस्तू व सेवा कर विभागाने कोणत्याही प्रकारे वाहने हस्तांतरीत करु नयेत.

उ) सदर निर्लेखित वाहनांऐवजी नवीन वाहन खरेदीसाठी निधी उपलब्ध असणे आवश्यक राहील.

ऊ) विहीत पध्दतीने वाहन खरेदी करणे आवश्यक राहील.

ए) सदर वाहने प्रत्यक्ष खरेदी करण्यापूर्वी चिन्हांकित करणे व ती यादी विनियम कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सादर करणे अनिवार्य राहील.

२. सदर वाहन खरेदी करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.५ येथील शासन निर्णयातील निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. प्रस्तावित निर्लेखित केलेल्या वाहनांच्या बदली नवीन वाहनांची खरेदी उद्योग ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भीय क्र. ३ व ४ येथील दि.०१.१२.२०१६ तसेच दि. २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयानुसार GeM Portal वरुन विहीत पध्दतीचा अवलंब करुन करण्यात यावी.

४. वस्तू व सेवा कर (मुंबई विभागासाठी ) एकूण १४ नवीन वाहन खरेदीवरील खर्च "मागणी क्र. जी-१. प्रधानशीर्ष २०४०, विक्री, व्यापार इत्यादींवरील कर, १०१,वसुली खर्च (०१) वसुली खर्च, (०१) (०१) विक्रीकर विभाग (अनिवार्य) (२०४० ००५१ ) १३ कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षाखालील उपलब्ध मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

५. उपलब्ध करुन दिलेल्या सदर तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल,लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती,निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ.माहिती वेळोवेळी शासनास सादर करावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग कार्यासन व्यय-७ यांच्या सहमतीने तसेच विनियम कार्यासनाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ७८/२०२५/विनियम, दि.२०.०२.२०२५ व कोषागार प्रशासन ५ कार्यासनाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ८१/२०२५/कोषा प्रशा-५, दि.०४.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात येत असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३१२१६२५१५४९०५ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIKRAM NIVRUTTI DHAMAL

Digitally signed by VIKRAM NIVRUTTI DHAMAL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT,
2.5.4.20=23b2f1b1fd914a87080cb68712db5efd17f65e69284fe1d3274a32de69eb6a25, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=10D36944A4B86EAB516B1B70183709C5FB570CFDF5A52755ADFEF51ED380B836, cn=VIKRAM NIVRUTTI DHAMAL
Date: 2025.03.12 16:26:39 +05'30'

**( विक्रम नि. ढमाळ )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
३) मा.उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई
४) मा.विरोधी पक्ष नेता,विधान परिषद/विधानसभा,विधानमंडळ सचिवालय,विधानभवन,मुंबई.
५) मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा ),महाराष्ट्र-१, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा ),महाराष्ट्र-२, महाराष्ट्र राज्य,नागपूर.
८) राज्यकर आयुक्त,महाराष्ट्र राज्य,वस्तू व सेवाकर भवन,मुंबई-४०० ०१०
९) विशेष राज्यकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, वस्तू व सेवाकर विभाग,मुंबई-४०० ०१०
१०) राज्यकर सह आयुक्त (प्रशिक्षण), वस्तू व सेवाकर भवन,माझगाव ,मुंबई .
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) आस्थापना अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी, वस्तू व सेवाकर भवन,माझगाव,मुंबई.
१३) कक्ष अधिकारी (उद्योग-४) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१४) कक्ष अधिकारी (प्रशा-४/ व्यय-७/विनियम/कोषा प्रशा ५ ) वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१५) निवडनस्ती/ कार्यासन वि.प्र.४